**महिला व बाल विकास विभाग (खुद्द) तसेच आयुक्त एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई कार्यालयासाठी नियुक्त केलेल्या KPMG कंपनीच्या ५ सल्लागारांच्या पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१८/प्र.क्र.१०५/का.१**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : **३० जून , २०१८**

वाचा :- (१) माहिती तंत्रज्ञान विभागाचा शासन निर्णय क्र.GAD-मातंसं-०८०/४/२०१४-०/०, Directorrate of IT (MH) दिनांक १ जुलै २०१४

(२) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः -ई गव्हर्नस-२०१५/प्र.क्र.१५/का.१, दिनांक ३ फेब्रुवारी २०१५

(३) महिला व बाल विकास विभाग पत्र क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.३८९/का.५, दिनांक ८ डिसेंबर २०१६

(४) महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय क्रमांकः, ई गव्हर्नस-२०१५/प्र.क्र.५०/का.१ दिनांक १० जानेवारी २०१८

(५) माहिती तंत्रज्ञान विभागाचा शासन निर्णय क्र.GAD-मातंसं-०८०/४/२०१४-०/०, Directorrate of IT (MH) दिनांक २० मार्च २०१८

(६) प्रकल्प अंमलबजावणी समितीची दिनांक २९ जून २०१८ रोजी झालेली बैठक

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय क्र. ई-गव्हर्नस-२०१५/प्र.क्र.१५/का.१, दि.३/२/२०१५ नुसार माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दिनांक १ जुलै २०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार विभागासाठी KPMG कंपनीकडुन खालील सल्लागार पदे भरण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

| | |
|---|---|
| १) प्रधान सल्लागार -१ पद | रुपये २,७५,०००/- |
| २) वरिष्ठ सल्लागार–२ पदे | रुपये २,२०,०००/- ( प्रति व्यक्ती) |
| ३) सल्लागार-१ पद | रुपये १,६०,०००/- |

२. दिनांक ३/२/२०१५ च्या शासन निर्णयानुसार विभागासाठी नियुक्त केलेल्या सल्लागार यांनी विभागातील खालील प्रकल्प /योजना पुर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी त्यांची ३ वर्षासाठी दि. ३० जानेवारी २०१५ ते दि.३० जुन २०१७ या कालावधीसाठी केलेल्या करारानुसार नेमणुक करण्यात आली आहे.

१) ई-ऑफीस मध्ये कामकाज सुरु करणे, ई-टेंडरिंग, ई-लिलाव, बाल आधार नोंदणी, बायोमेट्रिक ॲटेंडन्स, कायदेशीर केस ट्रॅकिंग सिस्टीम, आंगणवाडीसाठी बांधकाम आढावा, विविध सेवांसाठी मोबाइल ॲप्लिकेशन्स विकसित करणे, विविध ई शासन उपक्रमांचे अंमलबजावणी करणे.

२) आरोग्य आणि पोषण केंद्रांच्या अंतर्गत विविध उपक्रम राबवविणे जसे की मोबाइल आधारित आंगणवाडी अर्ज, बाल स्वच्छता अभियान आणि वेळोवेळी विभागाने ठरविलेल्या इतर विविध उपक्रमांची अंमलबजावणी करणे.

३) विविध योजना / पुढाकार आणि शिफारशींच्या परिणामांचे मूल्यांकन, भिक्षेकरी आणि जे जे अधिनियम, आंतरराष्ट्रीय आणि राष्ट्रीय सर्वोत्तम आचरण संशोधन इत्यादी सुधारासाठी सल्लागार समर्थन म्हणून कायदेशीर आणि धोरण चौकटीत सतत सल्ला देण्यास मदत करणे.

४) सामाजिक आणि आर्थिक सक्षमीकरण क्षेत्रा अंतर्गत विविध उपक्रमांची अंमलबजावणी करणे उदा. कौशल्य विकास आणि स्त्रियांची रोजगाराची मदत, महाराष्ट्रात पुढाकार इ.

५) महिलांचे अधिकार, कायदे, वाईट सवयींचे निर्मूलन इत्यादींसारख्या ऑनलाइन प्रशिक्षण मोहिमासारख्या सुरक्षेच्या संरक्षणाचे क्षेत्र आणि विविध उपक्रमांचे अंमलबजावणी करणे. बेटी बचाओ बेटी पढाओ - स्त्री भ्रूणहत्या रोखण्यासाठी महिला धोरण आणि बाल धोरण इ. च्या अंमलबजावणीसाठी रोड मॅप तयार करणे.

६) महिला आणि बालविकास खात्याने वेळोवेळी ठरवल्याप्रमाणे इतर अनेक उपक्रम

२. KPMG कंपनीकडून नियुक्त केलेल्या ४ सल्लागारांपैकी १ सल्लागार यांनी दिनांक ३१ /१०/२०१५ रोजी राजीनामा दिल्यामुळे विभागात ३ सल्लागार काम करीत होते. Data Analysis कामासाठी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई या कार्यालयासाठी २ सल्लागार नियुक्त करण्याचा प्रस्ताव प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दिनांक ८/८/२०१६ रोजी झालेल्या बैठकीत ठेवण्यात आला होता. बैठकीत दोन सल्लागार नियुक्त करण्यास मंजूरी देण्यात आली होती. त्यानुसार विभागाचे पत्र क्रमांक एबावि-२०१६/प्र.क्र.३८९/का.५,दिनांक ८/१२/२०१६ नुसार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना मंजूरी कळविण्यात आली आहे. २ सल्लागार आयुक्तालयात दिनांक ९ जानेवारी २०१७ च्या पत्रानुसार KPMG कंपनीकडून नेमण्यात आलेले आहेत.

३. माहिती तंत्रज्ञान विभागाने दिनांक १९ जुलै २०१७ च्या शासन निर्णयानुसार दिनांक ३० जून २०१७ पूर्वी नियुक्त केलेल्या सल्लागारांवर सोपविलेली कामे अपुर्ण असतील तर त्यांना दिनांक ३०/९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. दिनांक ३०/९/२०१७ नंतर नियुक्त केलेल्या व यापुर्वी नियुक्त केलेल्या सल्लागारांच्या सेवा दिनांक ३१/१२/२०१७ नंतर समाप्त करण्यात याव्यात अशा सूचना माहिती तंत्रज्ञान विभागाकडून निर्गमित करण्यात आल्या होत्या. दिनांक ३१/१२/२०१७ पर्यंत ज्या सल्लागारांच्या सेवा समाप्त केलेल्या नाहीत त्यांच्या सेवा दिनांक ९/१०/२०१७ च्या माहिती तंत्रज्ञान विभागाच्या शासन निर्णयानुसार दिनांक ३१/३/२०१८ पर्यत सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यांनतर दिनांक ४/१/२०१८ च्या शासन निर्णयानुसार दिनांक ३०/६/२०१८ पर्यत सेवा सुरु ठेवण्यास मान्यता दिलेली आहे.

४. महिला व बाल विकास विभागाच्या दिनांक १० जानेवारी २०१८ च्या शासन निर्णयानुसार १ प्रधान सल्लागार, २ वरिष्ठ सल्लागार व २ सल्लागार यांची सेवा **दिनांक ३० जून २०१८** पर्यंत सुरु ठेवण्यास मान्यता दिलेली आहे.

५. आता माहिती तंत्रज्ञान विभागाने दिनांक २० मार्च २०१८ च्या शासन निर्णयानुसार सल्लागार नेमणुक करण्यासाठी ६ कंपन्याशी करार केलेला असून ५ सल्लागारांची पदे ५ वर्षासाठी भरण्यास दिनांक २० मार्च २०१८ ते १९ मार्च २०२३ पर्यत भरण्यास मान्यता दिलेली आहे. तसेच त्यांना अनुज्ञेय असलेल्या वेतनात देखिल वाढ केलेली आहे. सदर सल्लागारांची पदे भरताना त्यांच्या पुर्व अनुभवाचा कालावधी देखिल वाढविलेला आहे.

६. विभागात यापुर्वी दिनांक ३ फेब्रुवारी २०१५ व दिनांक ९ जानेवारी २०१७ च्या शासन निर्णयानुसार KPMG कंपनीकडून उपलब्ध करुन दिलेले ५ सल्लागार विभागात खालीलप्रमाणे कार्यरत आहेत.

| अ.क्र. | नाव | पद | देण्यात येत असलेले वेतन |
|---|---|---|---|
| १ | श्री नविन गोडसे | मॅनेजर-१ | २,७५,००० |
| २ | श्री प्रसाद हलदे | वरिष्ठ सल्लागार-१ | २,२०,००० |
| ३ | श्री पंकज कुमार सिंग | वरिष्ठ सल्लागार-१ | २,२०,००० |
| ४ | श्री नवनाथ घोरपडे | सल्लागार-१ | १,६०,००० |
| ५ | श्री अक्षय जाधव | सल्लागार-१ | १,६०,००० |

या व्यतिरिक्त उपरोक्त सल्लागारांना माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दिनांक १ जुलै २०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय आहे.

७. महिला व बाल विकास विभागात सध्या बाल आधार नोंदणी, लाईन लिस्टिंग, PFMS प्रणालीत सेविकांचे मानधन आदा करणे, आयुक्तालयाचे संगणक संकेतस्थळ अद्ययावत करणे,पोषण अभियान कार्यक्रम राबविणे इ.संगणक ऑनलाईन सॉप्टवेअर अपडेट करण्याचे कामकाज सुरु आहे. त्यामुळे सल्लागाराची विभागास आवश्यकता आहे. त्यामुळे त्यांच्या सेवेस मुदत वाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

महिला व बाल विकास विभाग व त्याच्या अखत्यारीतील क्षेत्रिय कार्यालये,महामंडळ,आयोग इ.करिता संगणीकरण/ई गव्हर्नन्स प्रकल्प अंमलबजावणीकरीता सर्व क्षेत्रिय कार्यालयांकरिता संगणक विषयक प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी विभागाच्या दिनांक २४ मे २०१३ च्या शासन निर्णयानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीसमोर खालील ५ सल्लागारांच्या सेवेस मुदत वाढ देण्याचा प्रस्ताव दिनांक २९ जून २०१८ रोजी सकाळी ११.३० वाजता झालेल्या बैठकीत ठेवण्यात आला होता.

| अ.क्र. | नाव | पद | देण्यात येत असलेले वेतन |
|---|---|---|---|
| १ | श्री नविन गोडसे | मॅनेजर-१ | २,७५,००० |
| २ | श्री प्रसाद हलदे | वरिष्ठ सल्लागार-१ | २,२०,००० |
| ३ | श्री पंकज कुमार सिंग | वरिष्ठ सल्लागार-१ | २,२०,००० |
| ४ | श्री नवनाथ घोरपडे | सल्लागार-१ | १,६०,००० |
| ५ | श्री अक्षय जाधव | सल्लागार-१ | १,६०,००० |

२. माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दिनांक २० मार्च २०१८ च्या शासन निर्णयानुसार आता कार्यरत असलेल्या KPMG सल्लागार सर्व्हिस प्रा.लि. कंपनीच्या उपरोक्त ५ सल्लागाराच्या सेवांना मुदतवाढ देता येत नाही मात्र विभागातील बाल आधार नोंदणी, लाईन लिस्टिंग, PFMS प्रणालीत सेविकांचे मानधन अदा करणे व पोषण अभियानची राज्यात अंमलबजावणी करणे, आयुक्तालयाचे संगणक संकेतस्थळ अद्ययावत करणे इ. कामासाठी सल्लागारांच्या सेवेची विभागास नितांत आवश्यकता असल्यामुळे **दिनांक १ जुलै २०१८ ते ३० सप्टेंबर २०१८** या ३ महिन्याच्या कालावधीसाठी उपरोक्त ५ सल्लागारांच्या सेवा त्यांच्या नावासमोर नमुद

केलेल्या वेतनानुसार पुढे सुरु ठेवण्यास विशेष बाब म्हणून मुदतवाढ देण्यास समितीने मंजूरी दिलेली आहे त्यानुसार ३ महिने सेवा पुढे सुरु ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे. मात्र त्यापुढे संबधित सल्लागारांच्या सेवा आपोआपच संपुष्टात येतील.

३. विभागास प्रकल्प /योजना पुर्ण करण्यासाठी लागणा-या सल्लागारांच्या सेवा माहिती तंत्रज्ञान विभागाच्या दिनांक २० मार्च २०१८ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार नव्याने विहित कार्यपध्दती अनुसरुन प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या मान्यतेने माहिती तंत्रज्ञान विभागाच्या सहमतीने घेण्यात याव्यात.

४. सल्लागारांच्या वेतनावर व भत्यांवर होणारा खर्च ई-गव्हर्नन्ससाठी मंजूर केलेल्या विभागाच्या अर्थसंकल्पित तरतुदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२०९४९२७८३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.07.02 12:03:27 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य
५) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६) प्रधान सचिव ( मा.तं) माहिती तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय,मुंबई
७) सचिव (महिला व बाल विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजन,नवी मुंबई
१०) सह सचिव/उप सचिव वित्त विभाग (व्यय-६)/नियोजन विभाग (का.१४७२),मंत्रालय,मुंबई
११) राज्य सूचना अधिकारी (NIC),नविन प्रशासन भवन,मंत्रालयासमोर,मुंबई
१२) सह संचालक ( उद्योग),उद्योग संचालनालय,न.प्र.भ.मुंबई
१३) व्यवस्थापक, KPMG सल्लागार सर्व्हिस प्रा.लि,मुंबई /संबधित KPMG कंपनीचे सल्लागार
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
१६) जिल्हा कोषागार अधिकारी,नवी मुंबई
१७) कक्ष अधिकारी ( का.६) मंत्रालय,मुंबई
१८) निवड नस्ती (कार्यासन १)